अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील जिल्हा पुरवठा अधिकारी, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांच्या नियतकालिक बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदली-२३२०/प्र.क्र. ८४/ ना.पु.१५.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : १० ऑगस्ट, २०२०.

वाचा:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) विभागाचा शासन आदेश क्र. आस्थाप्र-२२१९/प्र.क्र.१७६/ना.पु.१५,दि.१४.०८.२०१९.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.३०/कार्या.१२, दि.७ जुलै,२०२० व दि. २३.०७.२०२०.

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (१), ४ (२) व ४ (३) अनुसार खाली नमूद केलेल्या अधिकारी यांची त्यांच्या नावासमोरील स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदली करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकारी यांचे नाव | सध्या कार्यरत ठिकाण | बदलीनंतर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. राजेंद्र रामभाऊ मिस्कीन | जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर | जिल्हा पुरवठा अधिकारी, गडचिरोली |

२. उपरोक्त नमूद अधिकारी यांना दिनांक १० ऑगस्ट, २०२० ( म.नं.) पासून स्तंभ-३ मधील नमूद ठिकाणाहून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

३. सदर आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून संबंधित जिल्हाधिकारी यांनी नव्याने आदेश काढण्याची आवश्यकता नाही.

४. सदर अधिकारी त्यांना अनुज्ञेय असलेल्या रुजू कालावधीत बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचेविरुद्ध सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन १४, दिनांक २३ डिसेंबर २०१६ मधील तरतुदींनुसार शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

५. बदली झालेल्या अधिकारी यांनी त्यांची बदली रद्द करणे अथवा त्यासाठी प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणल्यास संबंधितांची कृती गैरवर्तणूक समजण्यात येईल.

६. आहरण व संवितरण अधिकारी यांना कळविण्यात येते की, उपरोक्त अधिकारी यांचे त्यांच्या कार्यमुक्तीच्या दिनांकानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत पूर्वीच्या नियुक्ती ठिकाणाहून अदा करण्यात येऊ नये अन्यथा त्यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल.

७. संबंधित जिल्हाधिकारी यांनी सदर अधिकारी त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतची माहिती शासनास त्वरित सादर करावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८१०१६३९४८७१०६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Asmita Ravindra Patil

Digitally signed by Asmita Ravindra Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supply Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3aae158692ef65b4486d9f1ec9f35e5a368c85b29b6c959f9fc2c7c0e59d944c, serialNumber=8e2cf7f99a7e33f6152bff0b34255dd63550b37c8fbbb9a98cee4ecd4336f598, cn=Asmita Ravindra Patil
Date: 2020.08.10 16:50:18 +05'30'

**( अस्मिता पाटील )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्री. राजेंद्र रामभाऊ मिसकीन, जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर.
( यांना उपायुक्त (पुरवठा),नागपूर यांच्यामार्फत )

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, नागपूर.
२) उपायुक्त (पुरवठा), नागपूर.
३) महालेखापाल-१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), मुंबई.
४) जिल्हाधिकारी, चंद्रपूर / गडचिरोली.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर / गडचिरोली.
६) खाजगी सचिव, मा. मंत्री ( अनापु व ग्रासंवि ) यांचे कार्यालय.
७) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री ( अनापु व ग्रासंवि ) यांचे कार्यालय.
८) सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक.
९) निवडनस्ती/नापु-१५.